**राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत पात्र शिधापत्रिकाधारकांना आगामी गौरी-गणपती उत्सव व दिवाळी सणानिमित्त चार शिधाजिन्नस समाविष्ट असलेला शिधाजिन्नस संच "आनंदाचा शिधा" वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अधापु-२०२३/प्र.क्र.४५/ना.पु.२२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२ ऑगस्ट, २०२३.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंब शिधापत्रिकाधारक तसेच औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व जिल्हे व नागपूर विभागातील वर्धा या १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्ह्यांतील दारिद्र्य रेषेवरील (एपीएल) केशरी शेतकरी शिधापत्रिकाधारकांना सन २०२२ च्या दिवाळी सणानिमित्त तसेच सन २०२३ च्या गुढीपाडवा, डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती इ. सणांनिमित्त प्रत्येकी १ किलो या परिमाणात रवा, चनाडाळ, साखर व १ लिटर या परिमाणात खाद्यतेल हे शिधाजिन्नस समाविष्ट असलेला १ संच (आनंदाचा शिधा) ₹ १००/- प्रतिसंच या दराने वितरीत करण्यात आला आहे. त्याच धर्तीवर उपरोक्त शिधापत्रिकाधारकांना प्रथमत: गौरी-गणपती उत्सवानिमित्त (दि. १९ सप्टेंबर, २०२३) प्रतिशिधापत्रिका १ शिधाजिन्नस संच व तद्नंतर दिवाळी सणानिमित्त (दि. १२ नोव्हेंबर, २०२३) प्रतिशिधापत्रिका १ शिधाजिन्नस संच याप्रमाणे प्रतिशिधापत्रिका २ शिधाजिन्नस संच स्वतंत्ररित्या ई-पॉस प्रणालीद्वारे ₹ १००/- प्रतिसंच या सवलतीच्या दराने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय :-**

१. राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अंत्योदय अन्न योजना, प्राधान्य कुटुंब तसेच औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व आणि नागपूर विभागातील वर्धा अशा १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील दारिद्र्य रेषेवरील (एपिएल) केशरी शेतकरी शिधापत्रिकाधारकांना प्रत्येकी १ किलो रवा, १ किलो चणाडाळ, १ किलो साखर व १ लिटर खाद्यतेल या ४ शिधाजिन्नसांचा समावेश असलेला शिधाजिन्नस संच प्रथमत: गौरी-गणपती उत्सवानिमित्त प्रतिशिधापत्रिका १ शिधाजिन्नस संच व तद्नंतर दिवाळी सणानिमित्त प्रतिशिधापत्रिका १ शिधाजिन्नस संच याप्रमाणे प्रतिशिधापत्रिका २ शिधाजिन्नस संच स्वतंत्ररित्या ई-पॉस प्रणालीद्वारे ₹ १००/- प्रतिसंच या सवलतीच्या दराने वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार गौरी-गणपती उत्सवानिमित्त वितरीत करावयाचा संच दि. ०१ सप्टेंबर, २०२३ पासून ते दि. ३० सप्टेंबर, २०२३ या

कालावधीत व तद्नंतरचा दिवाळी सणानिमित्त वितरीत करावयाचा संच दि. १५ ऑक्टोबर, २०२३ पासून दिवाळी सणापर्यंत (दि. १२ नोव्हेंबर, २०२३) वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. पात्र लाभार्थ्यांना गौरी-गणपती उत्सव व दिवाळी सणानिमित्त वितरीत करावयाच्या "आनंदाचा शिधा" संचातील सर्व शिधाजिन्नस (रवा, खाद्यतेल, साखर व चना डाळ) खुल्या बाजारातून खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. आगामी गौरी-गणपती उत्सवानिमित्त राज्यातील पात्र शिधापत्रिकाधारकांना सदर शिधाजिन्नस संच विहीत वेळेत उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने आवश्यक शिधाजिन्नस संचांची खरेदी करण्याकरीता सन २०२३ च्या गुढीपाडवा, डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती इ. सणांनिमित्त निविदेद्वारे नियुक्त करण्यात आलेल्या केंद्रीय भांडार, मुंबई या पुरवठादारासोबत करण्यात आलेल्या करारनाम्यास पुर्वीच्याच दराने मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सन २०२३ च्या दिवाळी सणानिमित्त राज्यातील एकूण १,६५,६०,२५६ पात्र शिधापत्रिकाधारकांना प्रतिशिधापत्रिका १ शिधाजिन्नस संच वितरीत करण्याकरीता आवश्यक शिधाजिन्नस संच खुल्या बाजारातून खरेदी करण्याकरीता NeML NCDEX Group of Company या ऑनलाईन पोर्टलद्वारे निविदा प्रक्रिया राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. आगामी गौरी-गणपती उत्सवानिमित्त पात्र शिधापत्रिकाधारकांना आनंदाचा शिधा वितरीत करण्याकरीता, सन २०२३ च्या गुढीपाडवा, डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती इ. सणांनिमित्त केंद्रीय भांडार, मुंबई या नियुक्त केलेल्या पुरवठादाराकडून प्राप्त झालेल्या पूर्वीच्या न्युनतम दरानुसार रू.४७५.२८ कोटी व इतर अनुषंगिक खर्च रू.१७.८९ कोटी यासह एकूण रू.४९३.१७ कोटी इतक्या अंदाजित खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

तसेच, सन २०२३ मधील दिवाळी सणानिमित्त आवश्यक शिधाजिन्नस संचांची खरेदी करण्याकरीता घाऊक बाजारातील अंदाजित दरानुसार रू.३९५.७९ कोटी व इतर अनुषंगिक खर्च रू.१७.८९ कोटी यासह एकूण रू.४१३.६८ कोटी इतक्या अंदाजित खर्चास मान्यता देण्यात येत आहे. अशाप्रकारे आगामी गौरी-गणपती उत्सवानिमित्त तसेच दिवाळी सणानिमित्त नमूद केल्यानुसार एकूण रू.९०६.८५ कोटी इतक्या अंदाजित खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

६. उपरोक्त प्रयोजनासाठी येणाऱ्या खर्चास वित्त विभागाने निधी उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. सदर खरेदीसाठी येणारा खर्च ४४०८, अन्न साठवण व वखार यावरील भांडवली खर्च ०१ अन्न, १०१ प्रापण व पुरवठा, ०२ प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण, (०२) (०१) मुंबई शहर - खरेदीची किंमत (अनिवार्य), २१, पुरवठा व सामग्री (४४०८००७७) या लेखाशीर्षाखाली व अनुषंगिक खर्च ४४०८०२६४ या लेखाशीर्षखाली मंजूर अर्थसंकल्पिय तरतुदीतून भागविण्याकरीता मान्यता देण्यात येत आहे.

तसेच विक्रीतून जमा होणारी रक्कम लेखाशीर्ष ४४०८०१६६ (मुंबई) व लेखाशीर्ष ४४०८०१७५ (मुफसल) यामध्ये जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. याचप्रमाणे एकूण होणाऱ्या खर्चामधून जमा होणारी रक्कम वजा जाता येणारी तूट (०३) (०७) अन्न धान्य व्यवहारातील तूटीच्या प्रतिपूर्ती

अर्थसहाय्यासाठी अनिवार्य (२४०८०४११) ३३, अर्थसहाय्य लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७१/व्यय-१०, दि.२८.०७.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८२२१८४४१०१२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NETRA PRASHANT MANKAME

Digitally signed by NETRA PRASHANT MANKAME
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=19e4a6ac471ded0614da7ea31c20099ea471d8436dcf49faa3c0b2e0638732c3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C3DA775EEDF3E67170F45DF66F5DEAC516C0B0AB689DA4176D3BEBB60CCAD385, cn=NETRA PRASHANT MANKAME
Date: 2023.08.23 11:20:56 +05'30'

**( ने. प्र. मानकामे )**
**शासनाच्या उपसचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१२. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१३. सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१५. सर्व उपायुक्त (पुरवठा)
१६. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१७. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१८. सर्व कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१९. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.

२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई
२६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, मुंबई
२७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
२८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ द्वारा - वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२९. वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
३०. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
३१. NeML NCDEX Group of Company, आकृती कॉर्पोरेट पार्क, पहिला मजला, एलबीएस मार्ग, कांजुर मार्ग (पश्चिम), मुंबई- ४०० ०६६.
३२. केंद्रिय भांडार , न्यु शॉपिंग सेंटर,इमारत क्र. ३३ जवळ,सी जी एस क्वार्टर्स,सेक्टर ७ ,अँटॉप हिल, मुंबई - ४०००३७.
३३. निवडनस्ती (कार्यासन नापु-२२).